२०११०१०३१६००४७००१

**राज्यातील महानगरपालिका / नगरपरिषदांमध्ये जिल्हा योजनेतून"महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान (जिल्हा स्तर )"राबविण्याबाबत मार्गदर्शक सूचना..**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-अशस-२०१०/प्र.क्र.१९९/नवि-२०**
**मंत्रालय, मुंबई-३२**
**दिनांक - १ जानेवारी, २०११**

वाचा :- १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक : जिवायो-१००७/प्र.क्र.३९/का. १४८१, दिनांक १६ फेब्रुवारी, २००८.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक अशस-१४०७/३६०/प्र.क्र.२११/नवि-२०, दिनांक ३१ ऑगस्ट, २००९.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र राज्यातील ड-वर्ग महानगरपालिका, नगरपरिषदा तसेच नगरपंचायती यांच्या अग्निशमन सेवेतील तूट भरुन काढण्याकरिता व राज्यातील अग्निशमन सेवेचे सक्षमीकरण करण्याकरिता विविध आवश्यक उपाययोजना करण्याच्या दृष्टीने "महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान" राबविण्याचा निर्णय दिनांक ३१ ऑगस्ट, २००९ रोजी शासनाने घेतला आहे. या अभियांनातर्गत सद्यस्थितीत नागरी भागात अग्निशमन सेवेशी निगडीत पायाभूत सुविधांचे बळकटीकरण करण्यासाठी अग्निशमन केंद्र बांधणे, अग्निशमन वाहने उपलब्ध करुन देणे, राज्य अग्निशमन अकादमीचे बांधकाम पूर्ण करणे, प्रगत अग्निशमन अकादमीचे बांधकाम करणे इत्यादी बाबींची अंमलबजावणी करण्याची कार्यवाही सुरु आहे.

दिनांक ३१ ऑगस्ट, २००९ च्या सदर शासन निर्णयात परिच्छेद (IV) (ii) मध्ये जिल्हा स्तरावर "महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान " राबविण्यासाठी खालील तरतूद करण्यांत आली आहे:-

" दरवर्षी जिल्हा योजनेअंतर्गत उपलब्ध एकूण नियतव्ययातूनही या अभियानांतर्गत उपाययोजनांकरिता काही तरतूद संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना उपलब्ध व्हावी यासाठी जिल्हा योजनेअंतर्गतही वरील अभियानासाठी आवश्यक लेखाशिर्ष उघडण्यांत येईल. त्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यांत येतील."

हया तरतुदींच्या अनुषंगाने जिल्हा योजनेतून " महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान (जिल्हा स्तर ) " अशा अभियान राबविण्याबाबत मार्गदर्शक सुचना काढण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

राज्यातील प्रत्येक जिल्हयात सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या अग्निशमन सेवेच्या बळकटीकरणासाठी पुढील परिच्छेदात नमूद केल्यानुसार उपाययोजना करण्याच्या दृष्टीने जिल्हा योजनेतून महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान (जिल्हा स्तर ) हा अभियान राबविण्याचा निर्णय शासन याद्वारे घेत आहे.

**१) महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान ( जिल्हा स्तर ) अंतर्गत अनुज्ञेय बाबी :-**

महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान ( जिल्हा स्तर ) अंतर्गत खालील बाबींवरील खर्च करणे अनुज्ञेय राहील.

(i) अग्निशमन सेवांचे बळकटीकरण करण्यासाठी पूरक उपकरणे खरेदी करणे:- संचालक (अग्निशमन सेवा ) यांनी विहीत किंवा मान्य केलेल्या तांत्रिक तपशिलाप्रमाणे ब्रिथींग ॲपरेट्स, होज पाईप, होज कपलिंग, फोम ब्रँचेस, पोर्टेबल फायर पंप, हेड लॅम्प, जॅक्स, रेस्क्यु टुल्स ( उदा:- कटींग / स्प्रेडींग / लिफ्टिंग टूल्स, हायड्रॉलिककटर्स, गॅसकटर्स, मेटलकटर्स, चेन सॉज, सर्कुलर सॉ, पुलीज व रोप्स ), थर्मल इमॅजिंग कॅमेरा, इनफ्लेटेबल लाईट मास्ट, फायर रिटारडंट सूट्स व केमिकल सूट्स, इत्यादी पूरक उपकरणे खरेदी करणे.

(ii) अग्निशमन सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांची सेवा निवासस्थाने बांधणे.

(iii) अग्निशमन केंद्र व सेवा निवासस्थाने बांधण्यासाठी आवश्यक जागेचा भूसंपादनाचा खर्च भागविणे.

(iv) शहरात फायर हायड्रंट चे जाळे निर्माण करणे/जाळ्याचा विस्तार करणे.

**२) प्रशासकीय मान्यता :-**

महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान (जिल्हा स्तर ) अंतर्गत घ्यावयाच्या प्रकल्प प्रस्तावांना जिल्हाधिकारी प्रशासकीय मंजूरी प्रदान करतील. या अभियानांतर्गत पूरक उपकरणे याबाबींपैकी ज्या बाबींचे दर करार शासनाच्या मान्यतेने निश्चित करण्यात आले नाहीत अशा बाबींना संचालक, अग्निशमन सेवा महाराष्ट्र शासन यांची तांत्रिक मान्यता घेण्यात यावी. शासनमान्य दर करार उपलब्ध असल्यास शासनाने मान्यता दिलेल्या दर संविदेनुसारच खरेदी करण्यात यावी. जिल्हा नियोजन समितीने या अभियानाकरिता उपलब्ध केलेल्या वार्षिक नियतव्ययाच्या मर्यादेपर्यंतच मंजूरी सीमित ठेवण्यात यावी.

**३) अभियांनतर्गत अर्थसहाय्य मंजूर करण्याची कार्यपध्दती :-**

(i) महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान ( जिल्हा स्तर ) या अंतर्गत जिल्हयातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या अनुज्ञेय प्रकल्पांचा तरतुदीच्या उपलब्धतेनुसार अर्थसहाय्यासाठी विचार करता येईल.

(ii) जिल्हा नियोजन समितीने महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान ( जिल्हा स्तर ) साठी वार्षिक तरतूद करण्याच्या दृष्टीने जिल्हयातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाकडून पुढील आर्थिक वर्षात ज्या बाबींसाठी अर्थसहाय्य हवे आहे अशा बाबींचे प्रस्ताव ढोबळ अंदाजपत्रकासह जिल्हाधिकारी कार्यालयास प्राप्त करुन घ्यावेत. जिल्हयातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचे प्रस्ताव ढोबळ अंदाजपत्रकासह प्राप्त झाल्यावर प्राप्त अनुज्ञेय प्रस्तावांच्या आधारे जिल्हा योजनेच्या वित्तीय आकाराचा विचार करुन प्रस्तुत अभियानाकरीता उचित तरतूद करण्याचा प्रस्ताव जिल्हाधिका-यांनी जिल्हा योजनेअंतर्गत जिल्हा नियोजन समितीच्या

मंजूरीस्तव सादर करावा. तद्नंतर जिल्हा नियोजन समितीने प्रस्तुत अभियानासाठी मंजूर केलेला नियतव्यय सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना कळविण्याची व्यवस्था करावी व त्यांच्याकडून सविस्तर प्रकल्प अहवाल मागविण्यांत यावेत.

(iii) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाकडून प्राप्त सविस्तर प्रकल्प प्रस्ताव मंजूरीसाठी विचारात घेण्यापूर्वी जिल्हाधिका-यांनी-

(अ) संबंधित महानगरपालिका/नगरपालिकेने "महाराष्ट्र आग प्रतिबंधक जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम २००६ " च्या कलम २५ प्रमाणे विहित केलेला "अग्नी सुरक्षा निधी " स्थापन केला आहे याची खात्री करावी.

(ब) अग्नीशमन अधिकारी व कर्मचा-यांसाठी सेवा निवासस्थाने बांधण्याच्या प्रस्तावांना मंजूरी देताना ज्या जमिनीवर बांधकाम प्रस्तावित आहे त्या जमिनीची मालकी संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची असल्याबाबत खात्री करणे तसेच प्रस्तावित बांधकाम विकास आराखडा व विकास नियंत्रण नियमावलीशी सुसंगत आहे हे सुनिश्चित करणे अनिवार्य राहिल.

४ ) **<u>अभियांनतर्गत अनुज्ञेय अर्थसहाय्य</u>** :-

महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान ( जिल्हा स्तर ) या अंतर्गत परिच्छेद २ मध्ये नमूद बाबींसाठी १००% अनुदान अनुज्ञेय राहील.

**५) सनियंत्रण व पर्यवेक्षण :-**

सदर अभियानांतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाना देण्यात येणा-या अनुदानाच्या योग्य विनियोगाच्या दृष्टीने सदर अभियानाचे सनियंत्रण व पर्यवेक्षण करण्याची जबाबदारी संबंधीत जिल्हाधिका-यांची राहील. त्यांनी वितरीत केलेल्या अनुदानाच्या विनियोगासंदर्भात संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून उपयोगिता प्रमाणपत्र घेण्याची दक्षता घ्यावी. तसेच ह्या अभियानांतर्गत विहीत केलेल्या तांत्रिक दर्जाचे साहित्य खरेदी केले जाईल व खरेदी करतांना वित्तीय नियमांचे पालन केले जाईल याची विशेष दक्षता घावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( मनु कुमार श्रीवास्तव )
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. राज्यमंत्री ( नगर विकास ) यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री व मा. राज्यमंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव